सन २०१४-१५ करीता राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानाकरीता अनुसूचित जाती उप योजनांतर्गत (SCSP) केंद्र हिश्यापोटी रू. २७.४०७३ कोटी मंजूर करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सा.आ.वि. ३००११/७९/२०१५/आ-७**

१० वा मजला , गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक: ३१ मार्च , २०१५

**वाचा**

१) **आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. एल. १९०१२ / १ / २०१४- युएच, दि. २३.१२.२०१४ चे पत्र**
२) **आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. एल. १९०१२ / १ / २०१४- युएच, दि. २३.१२.२०१४ चे पत्र**

**प्रस्तावना -**

ग्रामीण भागातील गरीब, दुर्लक्षित तसेच गरजू ग्रामीण जनतेस सहज साध्य परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरदायी आणि विश्वासार्ह आरोग्य सेवा उपलब्ध करून देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरू केले आहे. आरोग्यावर परिणाम करणा-या महत्वाच्या घटकांचा ( उदा. आहार, परिसर, स्वच्छता, सुरक्षित पाणी पुरवठा, महिला व बाल विकास इ.) या अभियानामध्ये एकत्रितपणे विचार करण्यात आलेला आहे. सन २०१३-१४ या वर्षापासून केंद्र शासनाने उपरोक्त आरोग्य विषयक कार्यक्रम शहरी भागात सुध्दा राबविण्याचा निर्णय घेतला असून शहरी भागात हा कार्यक्रम "राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान" या नावाने राबविण्यात येत आहे. सदर अभियानाकरीता केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा यांचे प्रमाण ७५: २५ इतके असून केंद्र शासनाने ७५ टक्के हिश्यापोटी उपरोक्त पत्रान्वये अनुसूचित जाती उप योजनेंतर्गत मंजूर केलेले सहाय्यक अनुदान वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

राज्यामध्ये राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गातील लाभार्थ्यांकरीता अनुसूचित जाती उप योजनेंतर्गत ७५ टक्के केंद्र हिश्यापोटी रू.२७,४०,७३,००० ( रूपये सत्तावीस कोटी चाळीस लाख त्रैहत्तर हजार फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त प्रस्तावावरील खर्च, मागणी क्र. आर-१, २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ७८९- अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१)- अनुसूचित जाती उप योजनेंतर्गत योजना केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा ७५ %), (०१)(०४) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान (२२१० एफ ४९८), ३१- सहायक

अनुदान (वेतनेतर) या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदींतून भागविण्यात यावा.

३. सदर अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम संबंधित कार्यक्रम अधिका-याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक ( अ. व प्र.), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना " नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. २०१३/ प्र. क्र. ८५/ २०१३/ अर्थसंकल्प- ३, दि. २५.०४.२०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ८५/विघयो, दि. २७/२/२०१५ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २७२/२०१५/व्यय १५, दि. १७/३/२०१५, ११८/२०१५/व्यय १३, दि. ३०/३/२०१५ अन्वये व अर्थोपाय शाखेच्या प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१९११०२२०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Sadhu Thombare

Digitally signed by Manohar Sadhu Thombare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manohar Sadhu Thombare
Date: 2015.03.31 21:43:13 +05'30'

**(मनोहर ठोंबरे)**
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. महालेखापाल,( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.

३. आयुक्त ( कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान , मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सहसंचालक ( अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
६. सहाय्यक संचालक ( अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. प्रशासकीय अधिकारी ( आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०.सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग ( अर्थसंकल्प) , मंत्रालय, मुंबई.
१२.सार्वजनिक आरोग्य विभाग ( अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१३.सार्वजनिक आरोग्य विभाग ( लेखा ) , मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती ( आरोग्य -७)